**सामुहिक प्रोत्साहन योजना २०१३ मध्ये सुधारणा करण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : साप्रोयो २०१७/प्र.क्र .७३/उद्योग-८,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक -: १० /०४/२०१७

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय उ.ऊ.व कामगार विभाग क्रमांक पीएसआय-२०१३/प्र.क्र.५४/उ-८, दि. ०१/०४/२०१३.
२) शासन निर्णय उ.ऊ.व कामगार विभाग क्रमांक मंउस-२०१६/प्र.क्र.२५/उ-८, दि. ०५/०३/२०१६.
३) शासन निर्णय उ.ऊ.व कामगार विभाग क्रमांक मंउस-२०१६/प्र.क्र.२५/उ-८. दि. २२/०९/२०१६.

**प्रस्तावना :-**

राज्य औद्योगिक धोरण, २०१३ नुसार राज्यात औद्योगिक विकासाचा दर वाढवून राज्याच्या औद्योगिक वाढीत क्षेत्रीय समतोल व सर्व समावेशक विकास साधण्याचे उदिष्ट ठेवण्यात आले आहे. सामुहिक प्रोत्साहन योजना, २०१३ नुसार राज्यातील औद्योगिक विकासाची गती वाढवून प्रादेशिक विकासाचा समतोल साधण्यासाठी औद्योगिक दृष्ट्या मागास भागासाठी विशेष व अधिकची प्रोत्साहने देण्यात येत आहेत. त्यानुषंगाने मराठवाडा व विदर्भातील जिल्ह्यांसह उत्तर महाराष्ट्रातील धुळे व नंदूरबार जिल्हे व कोकणातील रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्ह्यातील यापुढे स्थापन होणाऱ्या विशाल व अतिविशाल उद्योगांना १०० टक्के ग्रॉस व्हॅट वर आधारित औद्योगिक प्रोत्साहने देण्याची तसेच मराठवाडा व विदर्भातील विशाल प्रकल्पांना औद्योगिक विकास अनुदान उपभोगण्याचा कालावधीत वाढ करण्याच्या अनुषंगाने संदर्भ क्र. २ व संदर्भ क्र. ३ वरील दि. ०५/०३/२०१६ व दि. २२/०९/२०१६ रोजीचे शासन निर्णय निर्गमित करण्यात आले.

सामुहिक प्रोत्साहन योजनेतील विशाल/अतिविशाल प्रकल्प संदर्भात काही सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विशाल/अतिविशाल प्रकल्पांसाठी गठीत मंत्रिमंडळ उप समितीने दि. २३/०३/२०१७ रोजी झालेल्या बैठकीत खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत : -

१) विदर्भ व मराठवाडा क्षेत्रातील जिल्ह्यांसह उत्तर महाराष्ट्रातील धुळे व नंदुरबार जिल्हा व कोकणातील रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्ह्यातील वस्त्रोद्योग क्षेत्रातील विशाल/अतिविशाल प्रकल्पांना अनुदान उपभोगण्याचा कालावधी भांडवली गुंतवणूकीच्या अतिरिक्त ५ वर्ष एवढ्या कालावधी करिता अनुदान उपभोगण्याचा कालावधी पात्र गुंतवणूकीच्या मर्यादेपर्यंत वाढविण्यात येत आहे. (सदर वस्त्रोद्योग घटकांसाठी दि. ०५/०३/२०१६ व दि. २२/०९/२०१६ च्या शासन निर्णयातील ५०% पात्र भांडवली गुंतवणूकीच्या मर्यादेची अट शिथील करण्यात येत आहे.

२) मराठवाडा व विदर्भ क्षेत्रातील जिल्ह्यासह उत्तर महाराष्ट्रातील धुळे व नंदुरबार जिल्हा व कोकणातील रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्हयातील ज्या घटकांना १०० टक्के निव्वह मुल्यवर्धित करावर आधारित देकार पत्र देण्यात आले आहेत, तथापि ज्या घटकांनी सामुहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत दि. ३१/०३/२०११ या तारखेपर्यंत उत्पादन सुरु केले आहे व सामुहिक प्रोत्साहन योजना २००७ चा त्या तारखेपर्यंत लाभ घेतलेला नाही. अशा घटकांना साप्रोयो २००७ च्या तरतूदी नुसार १०० टक्के ढोबळ मुल्यवर्धीत करावर आधारित प्रोत्साहने अनुज्ञेय करण्यात यावेत.

३) विशाल/अतिविशाल प्रकल्पांनी त्यांच्या प्रकल्पात प्रस्तावित केलेल्या एकूण स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या ५ टक्के इतक्या गुंतवणूक मर्यादेपर्यंत किंवा कमाल रुपये २५ कोटी यापैकी जी रक्कम कमी असेल त्या रकमेइतकी गुंतवणूक कामगारांच्या प्रशिक्षण केंद्रासाठी पात्र धरण्यात यावी.

४) शासन निर्णय दि. २२/०९/२०१६ च्या परि.१ मध्ये पुढील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

सदर लाभ मराठवाडा व विदर्भ क्षेत्रातील जिल्ह्यासह उत्तर महाराष्ट्रातील धुळे व नंदुरबार जिल्हा व कोकणातील रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्हयातील ज्या घटकांना ५० टकके ढोबळ मुल्यवर्धित करावर आधारित अथवा १०० टक्के निव्वळ मुल्यवर्धित करावर आधारित देकार पत्र देण्यात आले आहे तसेच दिनांक ०१/०४/२०१६ पर्यंत पात्रता प्रमाणपत्र देण्यात आले आहे तथापि, घटकाने सदर पात्रता प्रमाणपत्रान्वये अद्याप अनुदान उपभोगलेले नाही, अशा प्रकल्पांना देखील लागू राहतील.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०४१०१७३७५२०२१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, serialNumber=d337930b14433dc62c0154af2bbc60bb5a6edcaa66b7f34596c50a27eb0f6333, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2017.04.10 17:41:02 +05'30'

**( संजय इंगळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा .मुख्य सचिव, मंत्रालय, मंबई
२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (नगर विकास-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC), मुंबई
९) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१०) विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई
११) मा .मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२) मा .मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३) मा .राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती (उद्योग-८).